शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये सुरू करण्यात आलेल्या द्वितीय पाळीतील अभ्यासक्रमात बदल झाल्यामुळे पदनामात बदल करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र. टिईडी-२०१६/(६८/२०१६)/तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०१८.

संदर्भ :- १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. टिईडी-२००९/(९४/०९)/तांशि-५, दिनांक १/६/२०१०.
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. टिईडी-२०१०/(३०२/१०)/तांशि-५, दिनांक १९/१०/२०१०.
३. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. मान्यता-२०१४/प्र.क्र.७०/तांशि-५, दिनांक ८/७/२०१४.
४. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. टिईडी-२०१६/(६८/१६)/तांशि-५, दिनांक २२/९/२०१६.
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.९(३)/नियोजन/दुसरी पाळी पदनाम/४३०, दिनांक २५/४/२०१८ रोजीचे पत्र.
६. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.९(३)/नियोजन/दुसरी पाळी पदनाम/५२२, दिनांक ३०/८/२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या अखत्यारीतील अभियांत्रिकी पदविका अभ्यासक्रमासाठी राज्यात कार्यरत शासकीय/अशासकीय अनुदानीत व विना अनुदानीत १९ संस्थांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, अभ्यासक्रमास मान्यता देणे व त्याकरता आवश्यक पदनिर्मिती याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयांन्वये त्याअनुषंगाने सदर शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसऱ्या पाळीकरीता मान्यता देण्यात आलेल्या शिक्षकी पदांस विद्याशाखानिहाय व संस्थानिहाय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयाअन्वये शासकीय तंत्रनिकेतन, पुणे येथे द्वितीय पाळीकरीता अभ्यासक्रमांना मान्यता देण्यात आलेली आहे. तर संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयांन्वये शासन निर्णय दिनांक १/६/२०१० मान्यता देण्यात आलेल्या अभ्यासक्रमांऐवजी नवीन अभ्यासक्रमांबाबतचे शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आलेले आहे.

शासन निर्णय दिनांक २२/९/२०१६ अन्वये शासकीय तंत्रनिकेतन, औरंगाबाद या संस्थेत अणुविद्युत अभियांत्रिकी या अभ्यासक्रमाऐवजी विद्युत अभियांत्रिकी व शासकीय तंत्रनिकेतन, पुणे या संस्थांमध्ये अणुविद्युत अभियांत्रिकी या अभ्यासकमांऐवजी संगणक अभियांत्रिकी असा बदल करण्यास मान्यता देण्यात आल्यामुळे तेथील पदनामांमध्ये बदल करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंबई यांनी संदर्भ

क्र. ५ व ६ येथील पत्रांन्वये शासनास सादर केलेला आहे. त्यानुसार शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शुध्दीपत्रक :-**

उपरोक्त सर्व बाबी विचारात घेऊन संदर्भ क्र.२ येथील दिनांक १९.१०.२०१० रोजीचे शासन निर्णयांन्वये राज्यातील शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसऱ्या पाळीकरीता सुरू करण्यात आलेल्या अभ्यासक्रमांच्या पदनामांमध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.:-

| **अ.क्र.** | **संस्थेचे नाव** | **शासन निर्णय दिनांक १९.१०.२०१० मध्ये नमूद पदनाम** | **पदसंख्या** | **प्रस्तुत शासन निर्णयांन्वये बदल करावयाचे पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | शासकीय तंत्रनिकेतन, औरंगाबाद | विभागप्रमुख अणुविद्युत अभियांत्रिकी | १ | विभागप्रमुख विद्युत अभियांत्रिकी | १ |
| | | अधिव्याख्याता अणुविद्युत अभियांत्रिकी | ३ | अधिव्याख्याता विद्युत अभियांत्रिकी | ३ |
| २ | शासकीय तंत्रनिकेतन, पुणे | विभागप्रमुख अणुविद्युत अभियांत्रिकी | १ | विभागप्रमुख संगणक अभियांत्रिकी | १ |
| | | अधिव्याख्याता अणुविद्युत अभियांत्रिकी | ३ | अधिव्याख्याता संगणक अभियांत्रिकी | ३ |

२. प्रस्तुत बदल दिनांक २२.०९.२०१६ पासून अंमलात येतील.

३. हे शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१८१००५१५२२२७५३०८ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.10.05 15:25:30 +05'30'

**(अ. र. काटकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ००१,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, अलियावर जंग मार्ग, वांद्रे, मुंबई-४०००५१,
३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, औरंगाबाद/पुणे (तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचेमार्फत),

४. उपसचिव, विभागीय कार्यालय, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, औरंगाबाद, पुणे (महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेमार्फत),
५. मा.प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२,
६. संबंधित संस्था (तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचेमार्फत),
७. कक्ष अधिकारी, तांशि-७,
८. निवड नस्ती, तांशि-५.